महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील <u>अधिकाऱ्यांच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम</u> परिविक्षाधीन नगरपरिषद मुख्याधिकारी- संपर्क अधिकाऱ्यांची (Nodal Officer) नियुक्ती करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांकः एमसीओ २०१४/प्र.क्र. १५१/नवि १४**

**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**

**दिनांक: ११ सप्टेंबर, २०१४**

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टीआरएन २०१३/प्र.क्र. ८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४

२) कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्र. टीआरएन ०६१४/प्र.क्र. १६/१८-ब(२), दिनांक १९.०७.२०१४

## <u>शासन आदेश</u>

संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम विहीत करण्यात आला आहे.

**०२.** सदंर्भ क्र. २ येथील कार्यालयीन आदेशान्वये राज्यसेवा (मुख्य) परिक्षा, २०१३ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या गट-ब मधील २३ उमेदवारांना “**परिविक्षाधीन मुख्याधिकारी गट-ब**” या पदावर दिनांक ०९.०६.२०१४ पासून दोन वर्षासाठी परिविक्षा कालावधीवर नियुक्ती देण्यात आली आहे. सदर २३ उमेदवारांचे पायाभूत प्रशिक्षण वनामती, नागपूर येथे पार पडले आहे. दिनांक १५.०९.२०१४ पासून या परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचे व्यवसायिक, खातेनिहाय/ तांत्रिक प्रशिक्षण टप्पा-१ हे आठ आठवड्यांचे प्रशिक्षण व तद्नंतर ६६ आठवड्यांचे विभागनिहाय संलग्न प्रशिक्षण, जिल्हास्तरीय प्रशिक्षण व स्वतंत्र कार्यभार असे एकूण ७४ आठवड्यांचे प्रशिक्षण सुरू होत आहे.

**०३.** सदर ७४ आठवड्यांचे प्रशिक्षण परिणामकारकरित्या पार पाडणे, प्रशिक्षणार्थी व विविध विभागातील समन्वय राखणे आणि प्रशिक्षणार्थी मुख्याधिकाऱ्यांचे सनियंत्रण व त्यांचे मुल्यमापनाचा आढावा घेणे यासाठी **श्री. सुधाकर देशमुख (मुख्याधिकारी गट-अ), सहव्यवस्थापकीय संचालक व सचिव, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे** यांची नियुक्ती करण्यात येत आहे. एकत्रित प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत सामान्य प्रशासन विभाग व या विभागामार्फत वेळोवेळी निर्गमित करण्यात येणाऱ्या सूचना व त्याचे अनुपालन संबंधित विभाग/ कार्यालये आणि प्रशिक्षणार्थी यांचेकडून करुन घेणे ही त्यांची जबाबदारी असेल. तसेच त्यांना सहाय्य करण्यासाठी **श्री. गणेश देशमुख (मुख्याधिकारी गट-अ), उपायुक्त, मिरा भाईंदर महानगरपालिका, जि. ठाणे** यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

प्रशिक्षणार्थींच्या कामगिरीचे वेळोवेळी मुल्यांकन करुन त्याचा अहवाल सामान्य प्रशासन विभाग व या विभागास त्यांनी सादर करणे आवश्यक राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२३१५१५४४२६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: CN = Milind Raghunath Kulkarni, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = UDD
Date: 2014.09.23 17:53:50 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
३) महासंचालक, यशदा, पुणे
४) संचालक, वनामती, नागपूर
५) सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक
६) सर्व जिल्हाधिकारी
७) सर्व सह/ उपसचिव (आस्थापना)/ प्रशिक्षण- सर्व मंत्रालयीन विभाग
८) सर्व महानगरपालिका आयुक्त
९) सर्व नगरपरिषद मुख्याधिकारी

१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११) संचालक, नगर रचना व मुल्यनिर्धारण, पुणे
१२) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४) संचालक, समाज कल्याण, पुणे
१५) सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१६) मुद्रांक नियंत्रक व नोंदणी महानिरिक्षक, पुणे
१७) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, पुणे
१८) व्यवस्थापकीय संचालक, शहर व ओद्योगिक विकास महामंडळ, नवी मुंबई.
१९) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण
२०) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ ,५८३/ब, मार्केट यार्ड, गुलटेकडी,पुणे ४०००३७.
२१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, मुंबई
२२) सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
२३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ओद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
२४) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व पुर्नविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, बांद्रे (पूर्व), मुंबई ०५१.
२५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
२६) आयुक्त, पशुसवंर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२७) आयुक्त, प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२८) श्री. सुधाकर देशमुख, सहव्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे
२९) श्री. गणेश देशमुख, उपायुक्त, मिरा भाईंदर महानगरपालिका, जि. ठाणे
३०) सर्व परिविक्षाधीन मुख्याधिकारी, गट-ब (मार्फत वनामती नागपूर)
३१) सामान्य प्रशासन विभाग/ का.क्र. १८-ब
३२) नगर विकास विभागातील सर्व कार्यासने
३३) निवड नस्ती/ नवि १४ कार्यासन, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई